जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा
यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे
पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी ०२२३/प्र.क्र.४९ /कार्यासन ११**
पाचवा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०९ मार्च, २०२३.

पहा: १. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१, वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१.
२. शासन निर्णय क्र. अस्थायी ०२२२/प्र.क्र.३०/कार्यासन ११, दि.०८.०९.२०२२.
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३.
४. जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा यांचे पत्र क्र.बी.एडीएम/१५/१७७७/२०२३, दि.३१.०१.२०२३.

**प्रस्तावना :**

जिल्हा व सत्र न्यायालय सातारा ,यांच्या आस्थापनेवरील १२२ अस्थायी पदांना संदर्भ क्र २.येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

संदर्भाधीन अ.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु , ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही , अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि. ३१.०८.२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा यांच्या आस्थापनेवरील १२२ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा व सत्र न्यायालय ,सातारा यांनी दि.३१.०१.२०२३ रोजीच्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार त्यांच्या आस्थापनेवरील पुढील तक्यात नमूद केलेली १२२ अस्थायी पदे या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२३ ते दि. ३१.०८.२०२३ पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे .

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधीक्षक | ०२ |
| २ | सहायक अधीक्षक | ०७ |
| ३ | लघुलेखक (उ.श्रे.) | ०१ |
| ४ | लघुलेखक (नि.श्रे.) | ०७ |
| ५ | मराठी लघुलेखक नि.श्रे. | ०३ |

| | | |
|---|---|---|
| ६ | लिपिक नि लघुलेखक | ०१ |
| ७ | कनिष्ठ लिपिकाला लघुवेतन भत्ता | ०१ |
| ८ | वरिष्ठ लिपिक | १६ |
| ९ | कनिष्ठ लिपिक | ४१ |
| १० | प्रमुख बेलिफ | ०२ |
| ११ | बेलिफ | १५ |
| १२ | वाहनचालक | ०६ |
| १३ | झेरॉक्स चालक | ०१ |
| १४ | पुस्तक बांधणीकार | ०१ |
| १५ | चपराशी | १३ |
| १६ | पहारेकरी | ०३ |
| १७ | सफाईगार | ०२ |
| | **एकूण** | **१२२** |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, १०५ - दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२)(दत्तमत) (अनिवार्य) ०१, वेतन या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आपुक,दि.०८.०२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०९१६१९४६५०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2023.03.09 16:24:21 +05'30'

**( हेमांगी शेटये )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१. प्रबंधक, उच्च न्यायालय ,मुंबई.
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा .
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
६. विधि व न्याय विभाग, कार्या- २०/२३, मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग, व्यय-५/आ.पु.क.कक्ष/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती-कार्या-११.